**राष्ट्रीय कृषि विमा योजना**
**खरीप हंगाम-२००९ मधील नुकसान भरपाईतील राज्य शासनाच्या हिश्श्याची रक्कम व बँक सेवा शुल्काची रक्कम भारतीय कृषि विमा कंपनीस अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्र. एनएआयएस २०१०/प्र.क्र.१७६/११-अे
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
**दिनांक : २१ ऑगस्ट, २०१०**

**वाचा** :- १) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र एनअेआयएस २००९/प्र.क्र.१५३/११-अे, दि. ८ जून,२००९
२) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. सां.८/राकृवियो/नुभख०९/१६०/२०१०, दि.११ जून, २०१०
३) भारतीय कृषि विमा कंपनी लि., मुंबई यांचे पत्र क्र.MRO/KH09/CLM 2009/260/10,दि.३१ मे, २०१०
४) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. एनअेआयएस २०१०/प्र.क्र.१७६/११-अे, दि. १९ जुलै, २०१०
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. पुरक-२०.१०/प्र.क्र.१४९/अर्थसंकल्प-३, दि.३० जुलै, २०१०
६) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. पूरक-२०१०/(प्र.क्र.८५/१०)/२-अे, दि.०३ ऑगस्ट, २०१०

**प्रस्तावना -**

राज्यात रब्बी हंगाम-१९९९ पासून राष्ट्रीय कृषि विमा योजना राबविण्यात येत आहे. या योजनेमध्ये अधिसूचित करण्यात आलेल्या पिकांसाठी विमा उतरविलेल्या शेतकऱ्यांना त्यांच्या पिकाच्या झालेल्या नुकसानीप्रीत्यर्थ योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार देय झालेली नुकसान भरपाई अदा करण्यात येते. शेतकऱ्यांकडून प्राप्त झालेल्या विमा हप्त्याच्या रकमेपेक्षा जास्त नुकसान भरपाई देय झाल्यास जास्तीच्या नुकसान भरपाईपैकी ५० टक्के केंद्र शासन व ५० टक्के राज्य शासन या प्रमाणात अदा करण्यात येते.

राष्ट्रीय कृषि विमा योजनेअंतर्गत खरीप हंगाम-२००९ करिता अन्नधान्य व गळीतधान्य पिकांसाठी व कपाशी आणि कांदा या व्यापारी पिकांसाठी एकूण रु.३७४,८७,२३,२१५.४१ इतकी नुकसान भरपाई विमा कंपनीने निश्चित केली आहे. यामधून अन्नधान्य व गळित धान्य पिकांसाठी व कपाशी आणि कांदा या व्यापारी पिकांसाठी एकूण रु.१००,५९,२८,७९५.६६ इतकी भारतीय कृषि विमा कंपनीच्या हिश्श्याची रक्कम वजा जाता उर्वरित रक्कम रु.२७४,२७,९४,४१९.७५ पैकी ५०% प्रमाणे राज्य हिश्श्याची रु.१३७,१३,९७,२०९.८८ इतकी रक्कम भारतीय कृषि विमा कंपनीस अदा करणे आवश्यक आहे. सदर रकमेपैकी रु.५७,९९,६७,०००/- इतकी रक्कम उपरोक्त क्र.४ येथील शासन निर्णयान्वये भारतीय कृषि विमा कंपनीस अदा करण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे. उर्वरित रक्कम **रु.७९,१४,३०,२०९.८८** व बँक सेवा शुल्काची रक्कम **रू.१३,१०६.२८** अशी एकूण रक्कम **रू.७९,१४,४३,३१६.१६** भारतीय कृषि विमा कंपनीस अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय कृषि विमा योजनेंतर्गत खरीप हंगाम-२००९ करिता अन्नधान्य व गळीतधान्य पिकांसाठीच्या नुकसान भरपाईतील राज्य शासनाच्या हिश्श्याच्या **रु.१३७,१३,९७,२०९.८८** रकमेपैकी उर्वरित रक्कम **रु.७९,१४,३०,२०९.८८** व बँक सेवा शुल्काची रक्कम **रू.१३,१०६.२८** अशी एकूण रक्कम **रू.७९,१४,४३,३१६.१६** भारतीय कृषि विमा कंपनीस अदा करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

**(कृ.मा.प.)**

२. यावरील खर्च खालील लेखाशिर्षाखाली पूरक मागणीव्दारे उपलब्ध करून दिलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक डी -३**
**२४०१ पीक संवर्धन, ११० पीक विमा**
**(००) (०४) पीक विमा निधी दाव्यापोटी देण्यात येणारी नुकसानभरपाई**
**(२४०१ ३४११) दत्तमत, (योजनेतर) ३२-अंशदान**

३. शासन असेही आदेश देत आहे की, सहाय्यक संचालक, लेखा, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सदर प्रयोजनार्थ आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी **उपरोक्त रक्कम रू.७९,१४,४३,३१६.१६**(अक्षरी रुपये एकोणऐंशी कोटी, चौदा लाख, त्रेचाळीस हजार तीनशे सोळा आणि पैसे सोळा फक्त) इतकी रक्कम जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे येथून काढून धनादेशाव्दारे भारतीय कृषि विमा कंपनी लि., मुंबई यांना अदा करावी व त्याबाबत शासनास अवगत करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. क्र. पुरक-२०.१०/प्र.क्र.१४९/अर्थसंकल्प-३, दि.३० जुलै, २०१० व कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. पूरक-२०१०/(प्र.क्र.८५/१०)/२-अे, दि.०३ ऑगस्ट, २०१० च्या अधिन राहून व वित्त विभागाचा अनौ. संदर्भ क्रमांक १७२/१०/व्यय-१, दि.२०.०८.२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००८२११८२८२५००१ आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,**

**( ब. दि. उमाटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी लि.,मुंबई , न्यू स्टॉक एक्सचेंज बिल्डींग, दलाल स्ट्रीट, फोर्ट, मुंबई- २३
संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
निवासी लेखाधिकारी, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
कक्ष अधिकारी, २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
निवड नस्ती